**शालेय शिक्षण व क्रिडा विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्पांकरीता नियुक्त सल्लागारांच्या मुदतवाढीस कार्यात्तर मंजूरी देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईगव्ह-०६२२/प्र.क्र.१२/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- २० मार्च, २०२५

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, शासन निर्णय क्र. मातंसं २०२२/प्र.क्र.४७/से-२/३९, दि. २७.०९.२०२२.
२) विभागाचा सम क्रमांकाचा शासन निर्णय दि.१८.०७.२०२३
३) प्रकल्प अंमलबजावणी समितीचे दि.२३.०८.२०२४ व दि. ११.०३.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

शालेय शिक्षण विभागासाठी ई-गव्हर्नन्स प्रकल्पांसाठी नवीन सल्लागार कंपनीची निवड करण्यासाठी दि. ५.०८.२०२२ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत सादरीकरण घेण्यात आले. या सादरीकरणात दोन ई-गव्हर्नन्स सल्लागार कंपनीनी भाग घेतला होता. त्यापैकी विभागासाठी Ernst & Young या कंपनीची नेमणूक करण्याचा निर्णय प्रकल्प अंमलबजावणी समितीने घेतला आहे. ई-गव्हर्नन्स सल्लागार म्हणून Ernst & Young या कंपनीची एक वर्षासाठी निवड करण्यात आली आहे तसेच संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये आणखी-५ तांत्रिक सल्लागारांची एक वर्षाच्या कालावधीकरीता नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर सल्लागारांना दि.१८.१०.२०२४ पर्यंत मुदत वाढीस कार्योत्तर मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. प्रकल्प अंमलबजावणी समितीने दि. ५.०८.२०२२ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार ई-गव्हर्नन्स सल्लागार म्हणून Ernst & Young या कंपनीची एक वर्षासाठी निवड करण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये Ernst & Young या कंपनीच्या

अतिरिक्त तांत्रिक सल्लागारांची एक वर्षाच्या कालावधीकरीता नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर सल्लगारांना प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि. २३.८.२०२४ व दि.११.३.२०२५ रोजी घेण्यात आलेल्या बैठकीतील चर्चेनुसार दि.१८.०७.२०२४ ते १८.१०.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यास कार्योत्तर मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर सल्लागारांना माहिती व तंत्रज्ञान विभागाने संदर्भ क्र. १ अन्वये विहित केल्यानुसार शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च "मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०० इतर खर्च (०२) संकिर्ण (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२ H ४५४), ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०१७५४०९६७२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT., 2.5.4.20=57b66327fd02392673b4ab4d6a85fdd38e27f3be70b7a6bddc9bea3f08d2330b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF01D0AB2AFFB124678E1A586450069BBD9E2CBC928A89E57C1B37706CB9F428, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2025.03.20 17:55:47 +05'30'

**( समीर सावंत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

1. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
2. आयुक्त, (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
3. महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
4. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
5. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
6. निवडनस्ती/संगणक कार्यासन.